**कृषि उन्नती योजनेअंतर्गत अन्न व पोषण सुरक्षा (पुर्वीची एसएमएसपी योजना) या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत ग्रामबिजोत्पादन कार्यक्रमाकरिता सन २०२३-२४ मधील सर्वसाधारण प्रवर्गाचा निधी मध्ये वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स व्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : योजना ३३२३/प्र.क्र.१९०/१-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २८ मार्च, २०२४.

**संदर्भ :** १. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.योजना ३३२२/प्र.क्र.१६५/१-अे, दि.०१.११.२०२३ (प्रशासकीय मान्यता आदेश)
२. कृषि आयुक्तालयाचे पत्र जाक्र.गुनि.१/२/एसपीएम/अनुदान मागणी २३-२४ /३७२७, दि.०१/०२/२०२४
३. केंद्र शासनाचे पत्र क्र.१०-११/२०२०-एसडी.VI(e-८४८२९), दि.२३.१०.२०२३
४. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.योजना ३३२२/प्र.क्र.१५६/१-अे, दि.०४.०५.२०२३
५. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०८.१२.२०२३.
६. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.योजना ३३२३/प्र.क्र.१९०/१-अे, दि.१८.१२.२०२३
७. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.योजना ३३२३/प्र.क्र.१९०/१-अे, दि.०५.०१.२०२४
८. केंद्र शासनाचे पत्र क्र.१०-११/२०२०-एसडी.VI (e-८४८२९), दि.३१.०१.२०२४
९. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०५.०२.२०२४.
१०. केंद्र शासनाचे पत्र क्र.१०-११/२०२०-एसडी.VI(e-८४८२९), दि.२२.०३.२०२३.
११. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.योजना ३३२३/प्र.क्र.१९०/१-अे, दि.०९.०२.२०२४
१२. कृषि आयुक्तालयाचे पत्र जाक्र.गुनि.१/२/एसपीएम/अनुमागणी/तृतीय/२३-२४/९८५३, दि.२६/०३/२०२४

**प्रस्तावना:-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी कृषि उन्नती योजने अंतर्गत अन्न व पोषण सुरक्षा (पुर्वीची एसएमएसपी योजना) ग्रामबिजोत्पादन योजनेच्या अंमलबजावणीसाठी सर्वसाधारण प्रवर्गाकरिता केंद्र हिस्सा रु. १६१५.९९ लाख (६०%) व त्यास समरुप राज्य हिस्सा रु.१०७७.३२ लाख (४०%) अशा एकूण रु. २६९३.३१ लाख इतक्या निधीच्या कृती आराखड्यास संदर्भ क्र.०१ वरील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे.

सदर योजनेकरिता सन २०२३-२४ मध्ये केंद्र हिश्श्याकरिता लेखाशिर्ष क्र. २४०१ ३९९५ अंतर्गत रु.८००.०० लाख व राज्य हिश्श्याकरिता लेखाशिर्ष क्र. २४०१ ए१५४ अंतर्गत रु.५३३.०० लाख इतकी मूळ अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आलेली होती. तसेच केंद्र हिश्याकरीता रू.१४६४.७९ लाख व राज्य हिश्याकरीता रू.५४४.३२ लाख इतकी पुरवणी मागणी मान्य झालेली आहे. सन २०२३-२४ सर्वसाधारण प्रवर्गाकरिता केंद्र हिश्श्यापोटी एकूण रु.२२६४.७९ लाख व राज्य हिश्श्यापोटी रु.१०७७.३२ लाख इतकी एकूण अर्थसंकल्पिय तरतूद होत आहे.

कृषि उन्नती योजनेंतर्गत अन्न व पोषण अभियानामधील ग्रामबिजोत्पादन कार्यक्रमाकरिता सन २०२३-२४ साठी रूपये ४०३.९९ लाख इतका पहील्या हफ्त्याचा निधी केंद्र शासनाने संदर्भ क्र.०३ नुसार वितरीत केलेला होता. त्यानुषंगाने केंद्र हिश्श्याचा रु.४०३.९८ लाख व त्यास अनुसरून राज्य हिश्श्याचा एकूण रु.२६९.३२ लाख निधी वितरीत करण्यात आलेला आहे. तसेच, केंद्र शासनाने संदर्भ क्र.०८ नुसार रूपये ४०३.९९७ लाख इतका दुसऱ्या हफ्त्याचा निधी वितरीत केलेला होता. त्यानुषंगाने केंद्र हिश्श्याचा रु. ४०३.९९७ लाख व त्यास अनुसरून राज्य हिश्श्याचा एकूण रु.२६९.३३१ लाख निधी वितरीत करण्यात आलेला आहे. याप्रमाणे सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात राबविण्याकरीता संदर्भ क्र.४, ६, ७ व ११ अन्वये केंद्र हिश्श्यापोटी रु.१४५६.७९४ लाख व राज्य हिश्श्यापोटी रु. ५३८.६६२ लाख असा एकूण रु. १९९५.४५६ लाख निधी वितरीत केलेला आहे.

केंद्र शासनाने संदर्भ क्र.१० नुसार तिसऱ्या हफ्त्याचा रूपये ४०३.९९७ लाख निधी वितरीत केलेला असून त्यास अनुसरून राज्य हिश्श्याचा रू. २६९.३३१ लाख इतका निधी होत आहे. यानुषंगाने केंद्र हिश्श्याकरिता लेखाशिर्ष क्र. २४०१ ३९९५ अंतर्गत एकूण रू. ४०३.९९७ लाख व राज्य हिश्याकरीता लेखाशिर्ष क्र. २४०१ ए १५४ अंतर्गत एकूण रू. २६९.३३१ लाख असा एकूण रु. ६७३.३२८ लाख इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः**

कृषि उन्नती योजनेअंतर्गत अन्न व पोषण सुरक्षा (पुर्वीची एसएमएसपी योजना) या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत ग्रामबिजोत्पादन कार्यक्रमाकरिता केंद्र हिश्श्याकरिता लेखाशिर्ष क्र. २४०१ ३९९५ अंतर्गत रू. ४०३.९९७ लाख व राज्य हिश्याकरीता लेखाशिर्ष क्र. २४०१ ए १५४ अंतर्गत एकूण रू. २६९.३३१ लाख इतका निधी सर्वसाधारण प्रवर्गाकरीता सन २०२३-२४ या चालू आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर योजनेअंतर्गत होणारा खर्च चालू सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्रमांक-डी -३,<br>२४०१-पीक संवर्धन,<br>(००)(२३) कृषि उन्नती योजना,बियाणे व लागवड साहित्यावरील उपअभियान (केंद्र पुरस्कृत योजना) केंद्र हिस्सा - ६०%,<br>२४०१ ३९९५,<br>३३ अर्थसहाय्य, | मागणी क्रमांक-डी -३,<br>२४०१-पीक संवर्धन,<br>(००)(२७) कृषि उन्नती योजना,बियाणे व लागवड साहित्यावरील उपअभियान (केंद्र पुरस्कृत योजना) केंद्र हिस्सा - ४०%,<br>२४०१ ए१५४,<br>३३ अर्थसहाय्य, |

३. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधीन मार्गदर्शक सूचनांनुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवुन सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत.

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरुवातील अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरुपात रकमा विचारात घेता येईल व सदिंग्धता राहणार नाहित.

५) कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

६) सदर योजनेकरीता प्राप्त झालेला निधी हा ज्या संवर्गासाठी मंजूर केलेला आहे त्याच संवर्गासाठी खर्च होईल याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर योजनेकरीता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व त्यांच्या कार्यालयातील सहायक संचालक, लेखा-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर निधी खर्च करतांना विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/ टेंडर नियामावली व नियमांचे/प्रक्रियेचे/वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/P.W.D. म्यॅनूअलच्या अधिन राहून/C.V.C.तत्वानूसार/CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन निर्णय/अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहिल.

६. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग तीन मधील अनुक्र.४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थस-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०५.०२.२०२४ अन्वये दिलेल्या मंजूरीनुसार विभागाच्या स्तरावर निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०३२८१२५८३६२३०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE
Date: 2024.03.28 13:09:34 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा/परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
३) मा.प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित, महाबीज भवन, कृषिनगर, अकोला.
६) संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
९) सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
१०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११) सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) अवर सचिव, कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-१४), मंत्रालय, मुंबई.
१४) निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.